**महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना सन २०२३-२४ मधील ठोक रक्कम वितरीत करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३०/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ११ मार्च, २०२४.

संदर्भ :- १) विभागाचा समक्रमांकाचा दि.०७.०८.२०२३ रोजीचा शासन निर्णय.

२) विभागाचा समक्रमांकाचा दि.०६.१०.२०२३ व दि.१५.१२.२०२३ रोजीचे शासन निर्णय.

३) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व छत्रपती संभाजीनगर यांचे अनुक्रमे दि.१६.०१.२०२४, दि.०२.०२.२०२४ व दि.१२.०२.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर या विधी विद्यापीठांना त्यांचा दैनंदिन प्रशासकीय व शैक्षणिक खर्च, मंजूर आकृतीबंधानुसार भरलेल्या पदांचे वेतन व त्याव्यतिरिक्त विद्यापीठांनी भरलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन, इ. करिता प्रत्येक विधी विद्यापीठास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षापासून पुढील पाच वर्षे ठोक रक्कम म्हणून प्रति विद्यापीठ प्रति वर्ष रुपये ५ कोटी इतका निधी चार हप्त्यात उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ मधील पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या हप्त्यातील (माहे एपिल, २०२३ ते डिसेंबर, २०२३) प्रति हफ्ता प्रती विद्यापीठ रु.१,२५,००,०००/- असा एकूण रु.११,२५,००,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता पुढील हफ्त्याची रक्कम वितरीत करण्याची संदर्भ क्र.३ येथील पत्रान्व्ये विद्यापीठांनी विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने विधी विद्यापीठांना द्यावयाची ठोक रक्कम उपलब्ध करुन देण्यासाठी वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. त्यासअनुसरुन महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व छत्रपती संभाजीनगर यांना सन २०२३-२४ मधील चौथ्या हप्त्यातील (माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४) रक्कम मंजूर करुन उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपजी संभाजीनगर व नागपूर या विधी विद्यापीठांना त्यांचा दैनंदिन प्रशासकीय व शैक्षणिक खर्च, मंजूर आकृतीबंधानुसार भरलेल्या पदांचे वेतन व त्याव्यतिरिक्त विद्यापीठांनी भरलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन, इ. करिता महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना सन २०२३-२४ मधील चौथ्या हप्त्यातील (माहे जानेवारी, २०२४ ते मार्च, २०२४) एकुण

रक्कम **रु.३,७५,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त)** खालीलप्रमाणे वितरित करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

(रक्कम रुपयात)

| ठोक हफ्ता क्रमांक | महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई | महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर | महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर |
|---|---|---|---|
| **चौथा** जानेवारी-मार्च, 2024 | 1,25,00,000 | 1,25,00,000 | 1,25,00,000 |
| **एकूण** | 1,25,00,000 | 1,25,00,000 | 1,25,00,000 |

२. अटी व शर्ती :-

१. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर यांना शासनाकडून मंजूर झालेली ठोक रक्कमेची चौथ्या हप्त्यातील रक्कम ही विद्यापीठ निधीत जमा करुन सदर अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर रक्कमेतून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन व त्यास विद्यापीठाच्या वित्त समितीच्या मान्यतेने खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही संबंधित महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठांच्या कुलसचिव/ कुलगुरु यांनी करावी.

२. शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ ठोक रक्कम मंजूर करण्यात आलेली आहे, ही रक्कम त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आली आहे, हे पाहण्याची जबाबदारी विधी विद्यापीठांच्या कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची तसेच वित्त समितीची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व तपशीलवार खर्चाची माहिती उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास विहित वेळेत सादर करावी. त्याशिवाय पुढील टप्प्यातील निधी विधी विद्यापीठांना वितरीत करण्यात येणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

३. वरील सर्व ठोक रक्कमेची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांनी सदर कामाकरिता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरिता विधी विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

४. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी ठोक रक्कम मंजूर केलेली आहे त्याच उद्दिष्टासाठी मंजूर केलेल्या ठोक रक्कमेचा वापर करावा.

५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेला शासन निर्णय, क्रमांक :- भांखस-२०१४/ प्र.क.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेच्या तरतूदीनुसार व अटीनुसार संबंधित विद्यापीठांनी प्रत्येक बाबनिहाय असलेल्या नियमानुसार खर्च करण्यात यावा. तसेच शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेला शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क.२१५/उद्योग-४, दिनांक. २४.०८.२०१७ अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दती धोरणामध्ये सुधारणा केली असून केंद्र शासनाने विकसित केलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची

कार्यपध्दती राज्य शासनास वस्तू व सेवा खरेदीसाठी स्वीकृत करण्यास मान्यता दिली आहे. तरी त्यानुसार गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन वस्तू व सेवा खरेदी करणे बंधनकारक राहिल. तसेच यासंदर्भात वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील तरतुदी व अटींचे ततोतंत पालन करावे. तसेच शासनाच्या प्रचलित नियम व अटी, शर्ती विचारात घेऊन कार्यवाही संबंधित महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठाच्या कुलसचिव/ कुलगुरु यांनी करावी.

३. सदरहू मंजूर झालेली तरतूद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, छत्रपती संभाजीनगर व नागपूर विद्यापीठास तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची घालण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, नियोजन व वित्त विभागाचा अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.११४/१४७१ दि.२२.०२.२०२४ व दि.११५९/व्यय-५ दि.२७.०२.२०२९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३११११५५४२५३९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD
SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.11 16:03:47 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.कुलगुरू, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद.
३) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, मुंबई, नागपूर व औरंगाबाद.

४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)

५) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई विभाग.

६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.

७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई, पुणे.

१०) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.

११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.

१२) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३) उपसचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१४) उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१४) अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.